विभागीय आयुक्त कार्यालयात कार्यकारी अभियंता(स्था.) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या पदस्थापनेबाबत

**महाराष्ट्र शासन**

जलसंपदा विभाग

शासन आदेश क्र.संकीर्ण-२०११/(२७३/२०११)/आ.(वर्ग-१) --------(१)

मंत्रालय, मुंबई -४०० ०३२

दिनांक ०३.०८.२०११

संदर्भ :- नियोजन विभाग, शासन निर्णय क्र.आकृती-२०११/प्र.क्र.५/मग्रारो-३ दि.३१.०५.२०११

**आदेश**

नियोजन विभागाने (रोहयो) महाराष्ट्र ग्रामीण रोजगार हमी योजनेअंतर्गतच्या पदांसाठी संदर्भाधीन शासन निर्णयान्वये सुधारित आकृतीबंध जाहिर केलेला आहे. सदर आकृतीबंधानुसार नियोजन विभागाने महाराष्ट्र ग्रामीण रोजगार हमी योजनेअंतर्गत असलेली काही पदे रद्द / रुपांतरीत केलेली आहेत, त्यामध्ये जलसंपदा विभागातील कार्यकारी अभियंता (स्था.) संवर्गातील अधिकाऱ्यांची पदे रद्द केलेली आहेत. तसेच विभागीय आयुक्त कार्यालयात, कार्यकारी अभियंता संवर्गातील प्रत्येकी १ पद मंजूर केलेले आहे. जिल्हाधिकारी कार्यालयातील कार्यकारी अभियंता (स्था.) संवर्गातील रो.ह.यो.ची पदे रद्द झाल्याने व विभागीय आयुक्त कार्यालयात नवीन निर्माण झालेली पदे भरणे आवश्यक असलेमुळे, त्या पदांवरील अधिका-यांच्या नियुक्त्या खाली दर्शविल्या प्रमाणे करण्यात येत आहेत.

| **अ.क्र.** | **अधिका-याचे नाव (सर्वश्री)** | **सध्याचे पद** | **समायोजनाने पदस्थापना** |
|---|---|---|---|
| **१.** | **२.** | **३.** | **४.** |
| १. | एस.डी.बनसोडे | का.अ., ग्रा.भू.रो.ह.यो., जिल्हाधिकारी कार्यालय, पुणे | का.अ., विभागीय आयुक्त कार्यालय, नाशिक |
| २. | अ.स.देशमुख | का.अ., ग्रा.भू.रो.ह.यो., जिल्हाधिकारी कार्यालय, औरंगाबाद | का.अ., विभागीय आयुक्त कार्यालय, औरंगाबाद |
| ३. | प्र.धो.हेडाऊ | का.अ., ग्रा.भू.रो.ह.यो., जिल्हाधिकारी कार्यालय, यवतमाळ | का.अ., विभागीय आयुक्त कार्यालय, अमरावती |
| ४ | चं.सो.भस्मे | का.अ., ग्रा.भू.रो.ह.यो., जिल्हाधिकारी कार्यालय, भंडारा | का.अ., विभागीय आयुक्त कार्यालय, नागपूर |
| ५ | द.य.जाधव | का.अ., ग्रा.भू.रो.ह.यो., जिल्हाधिकारी कार्यालय, रायगड | का.अ., विभागीय आयुक्त कार्यालय, कोकण विभाग, नवी मुंबई |

२.	विभागीय आयुक्त कार्यालय,पुणे या कार्यालयातील कार्यकारी अभियंता (स्था.) संवर्गातील पदी वेगळयाने आदेश काढण्यात येत आहेत.

३.	संबंधित अधिका-यांनी त्यांच्या नवीन नियुक्तीच्या ठिकाणी त्वरित हजर होऊन पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास तात्काळ कळवावा.

४.	सदरहू आदेशानुसार १० दिवसाच्या आत नियुक्तीच्या ठिकाणी हजर न झाल्यास सदर कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियमांचे उल्लंघन करणारी असल्यामुळे संबंधीता विरुध्द महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपिल) नियम, १९७९ नुसार शिस्तभंगविषयक कारवाई करण्यांत येईल.

५. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०११०८०३१६२९२९००१ असा आहे.

हे आदेश तात्काळ अंमलात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

०३/०८/११

**(डॉ.माधव वीर)**
**शासनाचे अवर सचिव**

प्रत :-

प्रधान सचिव (रोहयो), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव (जलसंपदा)/सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
सर्व महासंचालक, जलसंपदा विभाग /सर्व कार्यकारी संचालक, पाटबंधारे विकास महामंडळे
जलसंपदा विभागातील सर्व मुख्य अभियंते व सह सचिव, मंत्रालय, मुंबई.
विभागीय आयुक्त, संबंधित विभागीय आयुक्त कार्यालये
जिल्हाधिकारी , संबंधित जिल्हाधिकारी कार्यालये
संबधित जिल्हा कोषागार अधिकारी/अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
खाजगी सचिव, मा. मंत्री जलसंपदा (कृ.खो.पा.मं. वगळून)
खाजगी सचिव, मा.मंत्री (रो.ह.यो. व जलसंधारण), मंत्रालय, मुंबई
खाजगी सचिव, मा. मंत्री, जलसंपदा (कृष्णा खोरे पाटबंधारे महामंडळ),
खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री, (जलसंपदा)
सर्व संबंधित अधिकारी,
सह सचिव (सेवा) / अवर सचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यासने - दक्षता-१/दक्षता-२/दक्षता-३ / गोपनीय शाखा (६ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई.
कार्यासन आ (वर्ग-१), संग्रहार्थ.